ई-गव्हर्नन्स प्रकल्पांतर्गत विभागास ई-ऑफिस प्रणाली राबविण्यासाठी पायाभूत सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी लॅपटॉप, संगणक, स्कॅनर व प्रिंटरची खरेदी करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः खरेदी-५५२४/प्र.क्र.१७/मातंक
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ.
फोर्ट, मुंबई-४००००१
तारीख: ०२ जुलै, २०२४

वाचा :-

१. सामान्य प्रशासन विभाग (मातं) शासन निर्णय क्र.मातंसं २०२०/प्र.क्र.३५ (अ)/से.१/का-३९, दि.१९/१०/२०२०.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भाग-३/उद्योग-४, दि.०१/१२/२०१६.
३. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४/०८/२०१७
४. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.खादीग्रा-२०२१/प्र.क्र.३१/उद्योग-४, दि.०७/०३/२०२४.
५. दि.०४/०६/२०२४ रोजी झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग (मातं) शासन निर्णय क्र.मातंसं २०२०/प्र.क्र.३५ (अ)/से.१/का-३९, दि.१९/१०/२०२० अन्वये ई-ऑफिस प्रणाली पूर्णत: कार्यान्वित करण्यासाठी या विभागाची निवड करण्यात आली आहे. यामुळे सदर प्रणाली प्रभावीपणे राबविण्याकरिता विभागास पायाभूत सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी लॅपटॉप, संगणक, स्कॅनर व प्रिंटरची खरेदी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय** :

ई-ऑफिस प्रणाली राबविण्यासाठी पायाभूत सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी खालीलप्रमाणे लॅपटॉप, संगणक, स्कॅनर व प्रिंटरची खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वस्तुचे नाव | खरेदी करावयाचे नग |
|---|---|---|
| १ | ऑल इन वन संगणक | ८१ |
| २ | प्रिंटर | ७१ |
| ३ | स्कॅनर | ५० |
| ४ | लॅपटॉप | १० |

२.	उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भाग ३/उद्योग-४, दि.१/१२/२०१६ (शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारित नियमपुस्तिका) मधील नियमानुसार तसेच सदर विभागाच्या दि.२४/०८/२०१७ व ०७/०३/२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील सुधारित प्रक्रिया अवलंबुन सदर खरेदी करण्यात यावी.

३.	संगणक, प्रिंटर, स्कॅनर व लॅपटॉप चे Specifications माहिती तंत्रज्ञान विभागाकडून निश्चित करून घेण्यात आले आहेत.

४.	यासाठीचा खर्च "मागणी क्रमांक एल-४ , ३४५१-सेक्रेटरीएट-आर्थिक सेवा-(०१)(०३)- ई गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी १७ संगणक खर्च-(३४५१ २८०८) मागणी क्रमांक एल-४ (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशिर्षातंर्गत सन २०२४-२५ मध्ये उपलब्ध झालेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५.	खरेदी करण्यात आल्यावर संगणक, प्रिंटर, स्कॅनर व लॅपटॉप या साहित्याची नोंद नोंदणी व भांडार शाखेने जडवस्तु संग्रहात घ्यावी.

६.	सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये सुधारित केल्यानुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ सोबतच्या परिशिष्टातील भाग पहिला, उप विभाग दोन, अनुक्रमांक २७-अ, नियम क्रमांक-७६ अन्वये विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२४०७०२१०३८१०८१२०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.07.02 14:47:05 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
३. सर्व उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
४. कक्ष अधिकारी (नोंदणी व भांडार शाखा), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्रामविकास) यांचे स्वीय सहायक, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट,मुंबई
६. निवड नस्ती (का.माहिती तंत्रज्ञान कक्ष), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई